नागरी जमीन ( कमाल धारणा व विनियमन ) अधिनियम, १९७६ अन्वये ना हरकत प्रमाणपत्र देण्याच्या परिणामी शासन नामनिर्देशित व्यक्तींना वाटप करण्यासाठी उपलब्ध असलेल्या ५ टक्के गाळयांच्या वाटपाची कार्यपध्दती व नियम.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
शा.नि.,क्र.-शानिप.१०(२००१)/प्र.क्र.-१०५/नाजकधा.-१,
दिनांक :- 30 जुलै २००२.

वाचा:-१. शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, क्र.-एजीएन-११८४/२३८८/का.-९, दि.- २०.२.१९८६.

२. शासन शुध्दीपत्रक, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, क्र.-एजीएन-११८६/२३८८/का.-९, दि.- ९.५.१९८६.

३. शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, क्र.-एजीएन-११८४/२३८८/का.-९, दि.- १४.७.१९८६.

४. शासन निर्णय, गृह विभाग, क्र.पीएमडी-०४९२/३९४०/प्र.क्र.७६/९२/ पोल-१, दि.- ६ जानेवारी, १९९३.

..........

**प्रस्तावना :-**

गृह विभागाच्या शा.नि.,क्र.-पीएमडी-०४९२/३९४०/प्र.क्र.-७६/९२ पोल-१, दि.६.१.१९९३ तील आदेशात पोलीस अधिकारी व कर्मचारी यांनी दाखविलेल्या अतुलनिय शौर्याबाबत ज्यांना राष्ट्रपतींचे पोलीस शौर्यपदक किंवा पोलीस शौर्यपदक किंवा पंतप्रधानांचे जीवनरक्षा पोलीस पदक जाहीर झालेले आहे अशांना राज्य शासनाकडून प्रोत्साहनार्थ रोख पुरस्कार देण्याचा निर्णय झाल्यामुळे शासनाने दिलेल्या सवलतींमध्ये व्दिरुक्ती होवू नये म्हणून अशा विजेत्यांना नागरी जमीन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ अन्वये शासनाला वाटपासाठी उपलब्ध होणा-या गाळयांतून सदनिका देण्याबाबतचा या पूर्वीचा निर्णय रद्द करावा असे सदर आदेशात नमूद केले आहे, त्यास अनुसरुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, क्र.एजीएन-११८४/२३८८/ का.-९, दि. २०.२.१९८६ व शासन शुध्दीपत्रक, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग,

क्र.-एचीएन-११८६/२२८८/का.-९, दि.- ९.५.१९८६ मधील आदेश पूर्वलक्षी प्रभावाने दि. १.१.१९९२ पासून रद्द करण्यात येत आहेत. तसेच शासन नामनिर्देशित व्यक्तींना वाटप करण्यासाठी उपलब्ध असलेल्या १० टक्के गाळ्यांच्या वाटपाची कार्यपध्दती व नियम विहित करण्यात आलेल्या शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, क्र.-एचीएन-११८४/२३८८/का.-९, दि.- २४.७.१९८६ च्या सहपत्रातील, महाराष्ट्र शासनाच्या [illegible] करीत असताना शौर्याचे कृत्य केल्याबद्दल राष्ट्रपती पोलीस पदक / पोलीस पदक / शौर्यपदक मिळणा-या व्यक्तींचा ३.३ च हा प्रवर्ग रद्द करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ. बा. तजारे )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक
५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक.
६. सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
७. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई.
८. मुख्य अधिकारी, विभागीय गृहनिर्माण मंडळ, मुंबई /पुणे/औरंगाबाद/नागपूर/कोकण.
९. सर्व सक्षम प्राधिकारी (नागरी कमाल जमीन धारणा)
१०. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१२. गृह विभाग, पोल-१, मंत्रालय, मुंबई.
१३. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य मुंबई.
१३. सर्व मंत्रालयीन विभाग.
१४. सर्व कार्यासन अधिकारी (नाजकक्षा).
१५. निवडनस्ती (नाजकक्षा-२).